सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये भिक्षेकरी गृह (अनिवार्य) (२२३५-२८७८) या लेखाशिर्षाखाली निधी वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

**शासन निर्णय क्र. भिक्षेगृ-२०२०/प्र.क्र.३५/का-९**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक- २३ जुलै, २०२०.**

वाचा- वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/ प्र.क्र.६४/ अर्थ-३, दि. १६ एप्रिल,२०२०

**शासन निर्णयः-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत भिक्षेकरी गृहे (अनिवार्य) (२२३५-२८७८), सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक एक्स १, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२- समाज कल्याण, १०४- वृध्द विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण, (०१) वृध्द विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण, (०१) (०१) भिक्षेकरी गृह (अनिवार्य) (२२३५-२८७८) या लेखाशीर्षाखाली एकूण रु. २१,४८,०६,०००/- फक्त (रु. एकवीस कोटी अठठेचाळीस लाख सहा हजार फक्त) इतका निधी मंजूर करण्यात आला आहे. त्यापैकी २१- पुरवठा व सामग्री या उद्दीष्टावर मंजूर रु. ३३,७७,०००/- (रु. तेहत्तीस लाख सत्याहत्तर हजार फक्त) इतक्या तरतूदीपैकी रु. २,५०,०००/- (रु. दोन लाख पन्नास हजार फक्त) इतका निधी या शासन निर्णयान्वये आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल व खर्च झालेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करण्यात येईल याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १०५० दि. ०३ जुलै, २०२० अन्वये प्राप्त मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००७२३१०५१२०३२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KHADIJA FAROOQUE NAIKWADE

Digitally signed by KHADIJA FAROOQUE NAIKWADE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=8cd35f5dfe17a9e9a0cd531b6bb11d782183e791bc817e7a736def213ac7d71b, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBA, ou=WOMEN AND CHILD DEVLOPMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KHADIJA FAROOQUE NAIKWADE
Date: 2020.07.23 11:26:15 +05'30'

**( खदीजा नाईकवाडे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालया मार्फत)
७. कक्ष अधिकारी (व्यय-६ / अर्थसंकल्प-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना तात्काळ वितरीत करण्यात यावा.
९. निवड नस्ती (का-९)